मुख्यमंत्री ग्राम सडक योजना टप्पा-२ या योजनेच्या अंमलबजावणीसाठी (रस्त्याचे कोअर नेटवर्क तयार करणे, PCI सर्वेक्षण व रस्त्यांचा प्राधान्य क्रम ठरविणे, सविस्तर प्रकल्प अहवाल, प्रारूप निविदा इ. तपासणी करणे) गठित केलेल्या समितीची फेररचना...

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः** मुग्रायो-२०२२/प्र.क्र.२५/बांधकाम-४
५ वा मजला, मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई-०१
तारीख: ०९ फेब्रुवारी, २०२२

वाचा :

१. **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग, क्रमांकः** मुग्रायो-२०२१/प्र.क्र.१६५/बांधकाम-४, दिनांक ०६ जानेवारी, २०२२
२. **शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग समक्रमांकः** दिनांक १९ जानेवारी, २०२२

**शासन परिपत्रक :**

राज्यात मुख्यमंत्री ग्राम सडक योजना टप्पा-२ या योजनेच्या अंमलबजावणीसाठी रस्त्यांचे कोअर नेटवर्क तयार करणे, PCI सर्वेक्षण व रस्त्यांचा प्राधान्यक्रम ठरविणे, सविस्तर प्रकल्प अहवाल, प्रारूप निविदा इत्यादींची तपासणी करण्यासाठी उपरोक्त वाचा मधील अनुक्रमांक २ येथील दिनांक १९ जानेवारी, २०२२ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये, संबंधित विभागातील अधीक्षक अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठित करण्यात आलेली आहे.

**०२.** शेत/पाणंद रस्ते हे प्रामुख्याने शेतीमधील कामांकरिता आवश्यक असणाऱ्या यंत्रसामुग्रीची वाहतूक करण्याकरिता तसेच बाहमाही वापराकरिता शेत/पाणंद रस्ते सुयोग्य असणे गरजेचे असल्यामुळे प्रमाणित दर्जाचे शेत/पाणंद रस्ते तयार करण्याकरिता, मातोश्री ग्रामसमृद्धी शेत/पाणंद रस्ते योजना नियोजन विभागामार्फत राबविण्यात येते. सदर पाणंद रस्त्याची कामे झाल्यानंतर या रस्त्याचे प्रस्ताव संबंधित जिल्हा परिषदेच्या सर्वसाधारण सभेची मान्यता घेऊन, जिल्हा परिषदेकडून प्रस्ताव विहित मार्गाने कार्यकारी अभियंता, संबंधित सार्वजनिक बांधकाम विभाग यांचेमार्फत संबंधित अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ यांचे मान्यतेने संबंधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांचे शिफारशीने शासन स्तरावरील सार्वजनिक बांधकाम विभागाकडे पाठविल्यानंतर, सार्वजनिक बांधकाम विभागाकडून अशा

रस्त्यांना ग्रामीण मार्ग क्रमांक प्रदान केला जातो/सदर रस्ता दर्जोन्नत होतो. तथापि, मुख्यमंत्री ग्राम सडक योजना टप्पा-२ या योजनेच्या अंमलबजावणीसाठी रस्त्याचे कोअर नेटवर्क तयार करण्यासाठी, PCI सर्वेक्षण व रस्त्यांचा प्राधान्यक्रम ठरविण्यासाठी सदर रस्त्यांची अद्ययावत माहिती समितीस असणे आवश्यक आहे.

**०३.** मुख्यमंत्री ग्राम सडक योजना टप्पा-२ या योजनेच्या अंमलबजावणीसाठी रस्त्यांचे कोअर नेटवर्क तयार करणे, PCI सर्वेक्षण व रस्त्यांचा प्राधान्यक्रम ठरविणे, सविस्तर प्रकल्प अहवाल, प्रारूप निविदा इत्यादींची तपासणी करण्यासाठी गठित करण्यात आलेल्या समितीमध्ये **संबंधित जिल्हा परिषदेतील कार्यकारी अभियंता (बांध.) यांचा आमंत्रीत सदस्य म्हणून समावेश** करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२०९१७४८५३९२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN DEVICHAND JAIN

Digitally signed by PRAVIN DEVICHAND JAIN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e86ac5658c4f446f46a56052bf048257ffe4ea09078de9d556ae5babe8adc8b1, pseudonym=37D9D56800E3803E7F4DEAA21F9F7FAB712736F6, serialNumber=481AF6EECE7C1D432D3119135BE703BF6529E7A455A9B17708C677B565D8EE24, cn=PRAVIN DEVICHAND JAIN
Date: 2022.02.09 17:56:57 +05'30'

**(प्रविण जैन)**
**वित्तीय नियंत्रक तथा उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई
२. मा.विधानसभा सदस्य, मा.विधानपरिषद, सदस्य.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
५. विभागीय आयुक्त, महसूल विभाग, सर्व.
६. मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे.
७. जिल्हाधिकारी, सर्व.
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
९. मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. मा.राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१२. अधीक्षक अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, सर्व विभाग.
१३. कार्यकारी अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, सर्व जिल्हे.
१४. कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद, सर्व.

१५. मा.अ.मु.स. (ग्रा.वि. व पं.रा.), ग्राम विकास विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१६. मा.सचिव, (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१७. निवड नस्ती (कार्यासन बांधकाम-४) ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.